चित्र १लें.

पृष्ठ १२



चित्र ३ रें. पृष्ठ ६६.



चित्र ४ थें: पृष्ठ १७



हास्यरसमालिका.
पुष्प १४ वें.

# रत्नरक्षण प्रहसन
अर्थात
# हिऱ्यांचा मनोरंजक फार्स

( डायमन्ड. चिंतामणीचा फार्स. )

---

प्रसिद्ध करणार,
विठ्ठल संभाजी मूरकर.
मुंबई " चक्रवर्तिनी " छापखाना.



सन १८९३.

---

किं चार आणे णे.

# प्रस्तावना.

—:*:—

जुन्या पद्धतीचे नाटककार आपल्या पौराणिक वगैरे नाटकाच्या शेवटीं सवडीनुसार एखादा मनोरंजक, हास्य-कारक किंवा चमत्कारिक असा फार्स करीत असतात. परंतु अलीकडे संगीत मंडळ्या निघाल्यापासून तशा तऱ्हेचे फार्स क्वचित होतात आणि त्यामुळें नवीन होतकरू नाटकमंळयांस व इतर रसिक लोकांस त्या फार्सांची माहिती व उपयोग करून घेतां येत नाहीं; असें जाणून आह्मीं जुनाट नाटकमंडळ्या करीत असलेले सुमारें १२ फार्स "हास्यरसमालिका" सदराखालीं छापून प्रसिद्ध केले व हा "हिऱ्याचा मनोरंजक फार्स"ही हल्लीं आह्मी छापिला आहे. या फार्सांत द्रव्याकारितां लहानापासून थोरापर्यंत कसकसे अचाट व भयंकर कृत्यें करितात इत्यादि गोष्टींचें मनोवेधक रीतीनें दिग्दर्शन केलें आहे. हा फार्स नाटककार मंडळ्यांस व इतर सर्व रसिक लोकांस चांगला उपयोगी पडेल अशी आह्मांस आशा आहे.

प्रकाशक.

हास्यरस-मालिका.

पुष्प १४ वें.

रत्नरक्षण प्रहसन

अर्थात

# हिऱ्याचा मनोरंजक फार्स.

( डायमन्ड चिंतामणीचा फार्स )

## प्रवेश पहिला.

स्थळ—राजमार्ग.

( प्रवासाच्या वेषांत असलेला सावकारपुत्र पद्माकर येतो. )

पद्माकर—

पद—" पंचतुंड नररुंड मालधर, " ही चाल

रक्षणकर्ता तूं जगदीश्वर चराचरीं तव रूप दिसे ॥ चैतन्यांशें भरून उरसी हें न जाणतां जीव पिसे ॥ १ ॥ नाम रूप कल्पना बुद्धिची दृढ होतां सहजांत फसे ॥ मायामय हा विश्वपसारा त्वदधि-

ष्ठानानें विलसे ॥ २ ॥ अस्ति भाति प्रिय आत्मतत्व-
तें ज्ञानोदय होतां गवसे ॥ योगाभ्यासी प्रयत्न करि-
ती परी तयांसही थांग नसे ॥ ३ ॥ श्रुति शास्त्रां
प्रति गूढ पडे आति तोंड न उघडे नेति असें ॥ बोलु-
नियां मौनावति ज्यास्तव जे या त्द्हृत्कमलीं भासे
॥ ४ ॥ तेजोमय तें तत्व सदोदित आठवितां कल्याण
असे ॥ असा भरंवसा ठेउनियां तुज जगन्निवासा
वंदितसें ॥ ५ ॥

असो. भगवंताचें स्मरण जो अहोरात्र करीत राहतो, त्याजवर जरी कालचक्राच्या अतर्क्यगतीमुळें अनेक संकटें आलीं, तरी तीं आपोआप नाहींशीं होतात. याचा अनुभव प्रत्यक्ष मी घेत आहें, असें ह्मटलें तरी चालण्या सारखें आहे. कारण—आमच्या जवळ नित्य सव्वालाख सोनटक्का प्रसवणारें रत्न आहे, ही बातमी आमच्या नगरच्या राजास कळतांच त्याची लालसा त्याच्या मनांत उत्पन्न झाली, आणि प्रथम त्यानें आमच्या वडिलांस आपल्या कचेरींत बोलावून नेऊन त्यांच्या जवळ राजरोसपणें त्या रत्नाची मागणी केली. पण आमचे बाबा काय तें त्याला देणार? त्यांनीं साफ नाहीं ह्मणून सांगतांच राजाच्या मनांत राहिलें आणि त्यानें शहरांतील बेरड व

रामोशी लोकांस बोलावून आणून आमच्या घरावर दरोडा घालण्याचा व तें रत्न चोरून आणण्याचा हुकूम केला. ती बातमी कळतांच बाबांनीं तो हिरा मजपाशीं देऊन मला प्रवासास जाण्याची आज्ञा दिली. त्या आज्ञेप्रमाणें हिरा घेऊन मी निघाल्यावर मागें रामोशांनीं आमच्या घरावर दरोडा घातला; पण त्यांस इच्छित वस्तु मिळाली नाहीं. शिवाय ती घेऊन मी परदेशीं निघून गेलों ही बातमी ही त्यांस कळली. तेव्हां जमाव करून ते माझाही पाठलाग करीत आले होते; परंतु ईश्वरानें माझ्या बाहूंस बळ दिलें आणि त्या सर्वांचा मी पराभव केला व त्या पाठलागांतून ही निभावून येथपर्यंत सुरक्षित आलों. प्रत्यक्ष राजानेंच लुटलें; पावसानें भिजविलें तर फिर्याद कोणावर करावी व कोणाजवळ गाऱ्हाणें सांगण्यास जावें? त्याचप्रमाणें आईनेंच मुलास विष दिलें आणि बापानें जिवें मारलें, तर त्याचें रक्षण कोण करणार आहे? सारांश—मजवर आलेला हा प्रसंग अनिवार्य आहे. यांतून आपलें आपणच रक्षण करून घेऊन पार पडलें पाहिजे. आजपर्यंत प्रवास करून आमच्या महाराजांच्या ताब्यांतील मुलुख सोडला व या अवंती नगरीच्या जवळ आलों आहें. आतां या नगरींत जो

रत्नाकर नांवाचा मोठा व्यापारी रहात आहे, त्याच्या घरीं जाऊन लहान मोठा जसा सांपडेल तसा उद्योग पतकरून रहावें आणि कांहीं दिवस काढावे. पुढचा विचार पुढें जसा प्रसंग येईल तसा करतां व पाहतां येईल. जातांक्षणीं मालकाचीच भेट होईल तर फार चांगलें.

[ असें बोलून निघून जातो. ]

---

## प्रवेश दुसरा.

### स्थळ—रामोशाचें घर.

( रामोशी, त्याचे दोन मुलगे व पाळलेली मुलगी येते. )

मन्याबा—हऱ्या, त्या सावकाराच्या पोरानं आपला सगळा जमाव तर नाहींसा केला. त्यांतून आपण तिघे मोठ्या प्रयासानें वांचलों आणि घरीं आलों. तों महाराजांनीं पुनः काल बोलावून नेऊन तो हिरा कसंही करून घेऊन या असा हुकूम केला. तेव्हां आतां कसं काय करावं बरं ?

हऱ्या—कसं करावं ह्मणून बसून कांहीं होणार नाहीं. कांहींना कांहीं युक्ति लढवून त्या पोराला गांठला पाहिजे. तसं न होईल तर आपण रामोशी कशाचे ? [ तिसऱ्या-

स ) कारे जन्या ? तूं अगदीं गप्पसा बसलास ? भ्यालास व्हय त्या पद्माकराला ?

**जन्या**—मी भितोया तर ! भागूबाईच असन अगदी !

**मन्यावा**—अरे लेकानों भागूबाई नव्हं तर युक्ती काढा.

• **जन्या**—युक्ति काढतो. त्या युक्ती बर्हुकूम सगळ्यांनी वागण्याचा निश्चय कराल तर ठीक आहे. काम फत्ते !

**मन्यावा**—काय युक्ती सांगतोस ऐकूं तर दे. मग त्या प्रमाणं वागण्याचा विचार ठरवितां येईल.

**जन्या**—आपल्या कुळांत काय ते आपण तिघे आणि ही रंगी चौथी, अशी चार माणसं उरलों आहों. बाकीच्या सगळ्यांना त्या सावकाराच्या पोरानं वाटेस लावलें. आपणांजवळ पैशाचा कांहीं तोटा नाहीं. तर ज्याप्रमाणं तो सावकाराचा पोर प्रवासाला निघून आपला देश सोडून अगदी परक्या मुलखांत गेला आहे, त्याप्रमाणं आपण ही सावकार बनावं आणि या रंगीला त्या पद्माकराची लग्नाची बायको ठरवून पुनः त्याचा शोध करीत निघावं. तो सापडला ह्मणजे ज्याच्या आश्रयानें राहिला असेल, त्याचें मन वळवून ही बायको त्याच्या गळ्यात बांधावी. ही आपल्या कामांत हुशार आहे. एकवेळ तो हिच्या आटोक्यांत आला ह्मणजे आपल्या स्वाधीन

झालाच असं समजावं. पहा बुवा, जर ही युक्ती पटत असेल तर विनाकारण वेळ फुकट घालविण्यांत अर्थ नाहीं.

मन्याबा—माझा विचार काय? तुमच्या पसंतीस उतरली असली तर मला कबूल आहे. रंगीला विचारा मात्र ह्मणजे झालं.

रंगी—मला काय विचारायचं बाबा? तूं आणि हे दोघे भाऊ मला जसं सांगाल तसं वागणं भागच आहे?

जन्या—असं बोलूं नको. आतां तूं समजुतदार बायको बनत चालली आहेस. आपलं हित, अनहित, बरं, वाईट हे सगळे प्रकार आतां तुला कळूं लागले आहेत. ह्मणून आमच्या विचाराप्रमाणें वागून त्या सावकाराच्या पोराजवळचा हिरा काढून घेण्याचं काम मनापासून तुला आवडतं नां? असं विचारतों. कारण तो हातीं लागेपर्यंत तुला त्याची बायको ह्मणवून बाह्यात्कारीं तरी त्याच्या हुकमांत वागावं लागणार आहे, या बद्दल आपल्या मनाजवळ चांगला विचार कर आणि आह्माला सांग.

रंगी—माझा विचार तुमच्या बाहेर नाहीं. बायकांच्या जातीला एखाद्याची बायको ह्मणविण्याचा प्रसंग आला तर त्यांत कांहीं अधिक आहे असें नाहीं.

मन्याबा—त्यांत कांहीं अधीक नाहीं हें खरें. पण

त्याची बायको होऊन तूं आपली अक्षयीं त्याच्याच जव-
ळ रहा असें कांहीं आह्मीं तुला सांगत नाहीं. आपल्या
कामापुरती त्याची बायको होऊन त्याला आपल्या आ-
टोक्यांत आणावयाचा व त्याजपासून तो हिरा काढून
घेऊन त्याचा निकाल लावावयाचा, हें काम मोठ्या शि-
ताफीनें करावें लागेल. नाहीं तर आतां तूं तारुण्यांत
आलेली आहेस व तोही तरुणाताठा देखणा आहे. तुम-
चें दोघांचें सूत्र जमलें ह्मणजे आमची दाद कोण घेणार
तसं न व्हावं.

रंगी—पण बाबा, तसं होईल अशी तुला खात्री वा-
टते कां ?

मन्याबा—खात्री तर वाटत नाहीं. आजपर्यंत आम-
च्या सांगण्या प्रमाणेंच तूं वागली आहेस. त्या बद्दल
संशय नाहीं.

रंगी—झालं तर जो बेत करायाचा असेल तो बेला-
शक करा आाणि चला. माझ्या कडून तयारी आहे.

इऱ्या—ठीक आहे तर. ( मन्याबास ) बाबा, तुह्मीं
थोरले सावकार बना; आह्मीं तुमचे मुलगे आहोंतच.
रंगीच्या नवऱ्याचा शोध करायाला आणि हिला त्याच्याकडे
पोंचवायाला निघालों आहों, अशा थाटानें बाहेर पडूं या.

जन्या—आपण हिला बरोबर घेऊन बाहेर निघणार हें तर ठरलेंच. पण पहिल्यानें तो कोणत्या देशांत जाऊन राहिला आहे याचा शोध करायाला नको कां ?

मन्याबा—आपण त्याचा पाठलाग करीत गेलों होतों, तेव्हां तो माळव्यांत जाण्याच्या रोंखानें चालला होता. त्याच्या हातचलाखी पुढें आपल्या जमावाचा टिकाव लागला नाहीं. रामोशी लोकांच्या कुळाचा क्षय न व्हावा, ह्मणूनच त्याच्या तडाक्यांतून आपण वाचलों आहों. तर कसेंही करून कोणत्या तरी उपायानें त्याचा सूड उगविलाच पाहिजे, हें ठरल्यासारखें आहे. आतां फार तर तो धार, देवास, किंवा उज्जनी ह्या मुलखांत जाऊन राहिला असेल. त्या प्रांतांत जाऊन प्रत्येक गांवीं फिरावं आणि त्याचा शोध लावावा. आमची ही रंगी त्याच्या जातीची बायको शोभण्यासारखी आहेच आहे. आपण वेशांतर केल्यावर गैर दिसतों असें नाहीं.

जन्या—ठीक आहे तर. चला, करा तयारी.

हऱ्या—तयारी काय करायची ? सावकारी थाटाला शोभतील असे पोशाख करा आणि पडाच घराच्या बाहेर. नित्य सव्वालाख सोनटक्का उत्पन्न ज्याला त्याची ही रंगी सून बनायाची आहे, तेव्हां तिचा इतमाम मात्र

कोणाच्या मनांत संशय उत्पन्न न करील असा असला पाहिजे. ठळक ठळक चार दागिने आंगावर घालून तिला चांगली सजवा आणि घ्या बरोबर. तो ज्याचा आश्रय धरून राहिला असेल त्यानें हिच्याकडे पाहतांच हीं त्या पद्माकराची बायकोच असावी असें मानलें पाहिजे.

मन्याबा—त्याविषयीं तुह्मांला काळजी नकोरे. पहा कसा प्रवासाचा थाट करतों तो. खरोखरीच्या सावकार लोकांनीं आपणां वेषधारी सावकारांकडे पाहतांच दिपून जावें व जागच्याजागीं खजील होऊन रहावें अशी टापटीप ठेवतों.

हृन्या—ठीक आहे. चला तर, आतां वेळ लावणें चांगलें नाहीं.

मन्याबा—चलाच तर, उठा आतां. रंगे, आमचे बेत ऐकलेसनां? आपली सर्व तयारी करून चल आमच्या बरोबर.

रंगी—माझी सगळी तयारी आहे. तुह्मी निघालेत कीं आंगावर शाल घेऊन मी बाहेर पडलेंच असें समजा.

मन्याबा—ठीक आहे, चलारे मुलांनों चला.

जन्या व हृन्या—चला बाबा चला.

---

## प्रवेश तिसरा

**स्थळ–उज्जनीतील भगवानदास सावकाराची पेढी.**

( सावकार, गुमास्ते वगैरे पेढीवर लिंहीत बसले आहेत तों पडदा उवडतो आणि पद्माकर येऊन दुकानासमोर उभा राहतो. )

**भगवानदास**—( गुमास्त्यांस ) मेहेताजी, आज प्रातःकालापासून पाहतों, आपल्या दुकानावर एकसारखी ग्राहकांची दाटी आहे मी स्वतां दुकानावर येऊन बसूं लागल्यापासून कांहीं कधींही अशी गर्दी पाहिली नवती. दुसरा प्रकार असा कीं, आज सकाळ पासून एक तरुण गृहस्थ आपल्या दुकाना समोरच्या ओट्यावर बसलेला आहे व त्याचा रोंख आपल्या दुकानांत येऊन कोणाजवळ तरी बोलण्याचा आहे, असें उघड दिसतें. या साठीं तुह्मीं स्वतांच त्या गृहस्थाजवळ जा आणि त्याला आपल्या दुकानांत बोलावून आणा. ह्मणजे त्याची चौकशी करण्यास चांगलें सोईवार पडेल.

**मेहताजी**–ठीक आहे. शेटजीचा हुकूम आहे तर त्याला भेटतों व दुकानांत घेऊन येतों. ( जातो व पद्मा-

करासह येतो. ) हे आमचे शेटजी, आपण पुढें होऊन त्यांची भेट घ्यावी.

पद्माकर—ठीक आहे. ( पुढें होऊन व नमून ) शेटजी साहेब.

भगवानदास—यावें. या तक्याजवळ बसावें.

पद्माकर—मला गरीब मनुष्यास तक्याजवळ टेंकून बसण्याचा मान कशाला पाहिजे? आपण कृपाकरून मला दुकानांत बोलावून आणलें आहे, त्या प्रमाणें आश्रय देऊन कांहीं तरी सेवा सांगावी, इतकीच आपल्या चरणाजवळ प्रार्थना आहे.

भगवानदास—आपण कोणत्या प्रांतांतील राहणारे आहां? व कोणत्या उद्देशानें या प्रांतांत आलां आहां हें सांगावें.

पद्माकर—मी दक्षिण प्रदेशांत राहणाऱ्या एका सावकाराचा पुत्र आहें. घरीं आईबाप व कुटुंब असतां केवळ राजभयामुळें मला एकट्यालाच प्रवास करण्याचा प्रसंग आला आहे. तो प्रवास करून ज्या राज्यांत रहात होतों, त्याची हद्द सोडून निर्भय झालों. तरी योग्य आश्रय मिळण्याची चिंता आहे, तो आपण दिलात ह्मणजे

काळजीतून मुक्त झालों असें मानावयास कांहीं चिंता उरली नाहीं.

भगवानदास—इतकेंचनां कायतें. बेलाषक तुह्मीं माझ्या घरीं आपलें घर मानून रहावें. मला तरी मूलबाळ कोठें आहे ? तुमच्या सारखा रूपगुण संपन्न तरुण जर आपल्या इच्छेनें राहिला तर मी त्याचा सहवास आनंदानें कबूल करीन.

पद्माकर—ठीक आहे तर. आजपासून आपण हा आपला मुलगाच आहे असें मानवें. त्याचप्रमाणें मीही आपणांस आपल्या वडिलांच्या ठिकाणीं मानून आपली आज्ञा शिरसावंद्य समजेन. आणि काया, वाचा व मनें-करून त्या आज्ञेप्रमाणें वागेन. त्यांत काडीमात्र अंतर करणार नाहीं.

भगवानदास—ठीक आहे. ह मला कबूल आहे. तर आनंदानें राहून माझ्या वार्धक्यांत मला सुख दे ह्मणजे झालें.

एक सेवक—( प्रवेश करून ) शेट साहेब, आपल्या माजघरांतली भिंत एकाएकीं कोसळून पडली आहे व त्या भिंतीतून सोन्याच्या मोहोरांनीं भरलेला तांब्याचा हंडा बाहेर पडला आहे तो पाहण्यासाठीं व त्याची

व्यवस्था करण्यासाठीं लौकर घरीं यावं, असं बाई साहेबांनीं सांगितलं आहे.

**भगवानदास**—काय ह्मणतोस ? भिंत पडली आणि तींतून सोन्याच्या मोहोरांचा हांडा बाहेर निघाला ! ठीक आहे. हा आमच्या या मुलाचाच पायगुण यांत संशय नाहीं. तूं पुढें हो, मी हा आलोंच ह्मणून सांग जा. ( पद्माकरास ) मुला, तुझें नांव काय तें एकवेळ सांग बरें.

**पद्माकर**—मला पद्माकर असें ह्मणतात.

**भगवानदास**—नांव फार चांगलें आहे, तरी आह्मी तुला बाळा ह्मणूनच हांक मारणार, हें ध्यानांत ठेव आणि मजबरोबर घरीं चल. तुझ्या राहण्यासवरण्याची व जेवणाखाणाची सर्व व्यवस्था आमच्या घरींच होईल हें निराळें सांगणें नकोच.

**पद्माकर**—ठीक आहे. यापासून माझ्या चित्तास आनंद आहे. बेलाशक आपल्या मनास वाटेल तें काम आपण मला सांगावें.

**भगवानदास**—मेहेताजी, आह्मी घरांत भिंत पडली आहे तिकडे जातों. दुकानावर नजर असूंद्या.

**मेहेता**—ठीक आहे. आपण इकडची काळजी मनांत न ठेवितां आनंदानें घरीं जावें. इकडचा सर्व कारभार मी पाहातों.

भगवानदास—बाळा, चलच तर आतां मजबरोबर.

पद्माकर—हा मी तयार आहें चलावें. [ जातात. ]

मेहेता—( शेजारीं बसलेल्या कारकुनास ) जरासा देखणा व गोरा गोमटा तरुण मनुष्य पाहिला ह्मणजे आमचे यजमान त्याच्या नादीं लागतात व त्याजवर पुत्रवत प्रेम ठेवतात. आजपर्यंत असे चौवे तरुण यांना फसवून गेले. आतां हा पांचवा किती दिवस टिकतो हें पाहणें आहे.

कारकून—मागच्या चोहोंपेक्षां आजच्या तरुणाचा रंग निराळा दिसतो. हा कांहीं दिवस टिकेल असें वाटतें.

मेहेता—टिको बिचारा आणि ह्मातान्याला सुख देणारा निघो, ह्मणजे गंगेंत घोडे न्हाले असें मोठ्या आनंदानें मी मानीन.

कारकून—हें असो. शेटजी नव्या पाहुण्याला बरोबर घेऊन आपल्या घरीं निघून गेले. आतां आपण किती वेळपर्यंत दुकानावर बसून राहणार ?

मेहेता—आतां वेळ कसला ? दोन प्रहर होत आले. तेव्हां चलाच आपापल्या घरीं ह्मणजे झालें. आटपा दप्तर.

कारकून—( चोपड्यांचा रुमाल बांधून ) हें आटपलें, चला. ( असें बोलून सर्व निघून जातात. )

## प्रवेश चवथा.

### स्थळ—उज्जनी शहरांतील धर्मशाळा.

[ सावकारी वेषानें रामोशी, त्याचे दोन पुत्र व रंगी हीं येतात. ]

**मन्याबा**—रंगाबाई, दमलीस व्हय बया. बैस आतां या धर्मशाळेंत आनंदानें. परमेश्वर करील तर याच गावांत तुझ्या नवऱ्याचा शोध लागेल आणि मग तुह्मी दोघें आनंदानें एकत्र रहाल.

**रंगी**—असंरे काय बाबा हें! तूं मला उगीच वरचेवर लाजवूं नको.

**हऱ्या**—त्यांत लाजवतो काय? जें खरें आहे तें खरंच.

**रंगी**—बरं, असूंदे खरं काय तें! आधीं जाऊन शोध करून या. मग खऱ्या खोट्याचा निवाडा करायाला पुष्कळ वेळ आहे.

**जन्या**—असं तर खरंच. बाबा, तो या उज्जनींत आहे हें ठरलेंच. प्रत्यक्ष पाहिल्यावर संशय कसला? आतां तो कोणाच्या आश्रयानें राहिला आहे? याचा शोध लावून त्याला दिसण्याच्या आधीं त्याच्या आश्रयदात्याचा शोध लावणें, त्याची एकांती भेट घेऊन आपण सर्व

त्या पद्माकराच्या सासुरवाडीचींच माणसें आहों व ही रंगी त्याची लग्नाची बायको आहे हें त्याच्या मनांत भरवून देणें हें काम कोण पतकरतो ? बोला.

मन्याबा—अरे त्यांत पतकरायचें काय ? सगळीं कामें आपल्यालाच केलीं पाहिजेत, आणि शेवटचें नाजुक पण मुख्य काम तें या पोरीचें आहे.

जन्या—तें तर ठरलेंच आहे. तिनें आजपर्यंत अशीं शेंकडों कामें पार पाडलीं आहेत, तेव्हां याबद्दल तिला सांगायाला नको. तरी सगळें रंगांत आणून तिच्या हवालीं करीपर्यंत कांहीं तिला बोलतां येत नाहीं. तें आपणच केलें पाहिजे. यासाठीं चला. टेहेळणी करण्यासाठीं पोषाख करून सहज बाजारांतून फिरण्यासाठीं जावं आणि प्रत्येक दुकानांत नजर फेंकावी. तो जर या गांवांत आणि सावकाराच्या आश्रयाला आहे तर बाजारांतील कोणत्याना कोणत्या तरी दुकानांत बसलेला दृष्टीस पडलाच पाहिजे.

हऱ्या—असं आहे तर बसून राहतां काय ह्मणून ? चला, जाऊन फिरून तरी येऊं. तो दृष्टीस पडल्यावर त्याच्या यजमानाकडे जाऊन त्याची भेट घेतली पाहिजे. कामें काय थोडीं आहेत ?

मन्याबा—चलाच तर करा पोषाख (रंगीस) बेटा, तूं बस बरें आतां या धर्मशाळेंत आह्मी लौकरच परत येतों.

रंगी—बाबा, जा पण दिवे लागले नाहींत तों परत या. नाहींतर मला एकटीला इथं भय वाटूं लागेल.

हृन्या—अस कसं होईल? दिवस आहे तोंच आह्मी आपलें काम करून आनंदानें परत येऊं.

रंगी—जा तर, लौकर या.

मन्याबा—चलारे मुलानों शहराची रचना पहायाला.

जन्या—ताई, सामान सुमान पडलेलें आहे. संभाळून हुशारीनें बैस. नाहींतर इकडे तिकडे पहात बसशील.

रंगी—काळजी करूं नका. जा आणि लौकर परत या ह्मणजे झालं.

मन्याबा—चलारे मुलानों. पडा बाहेर.

( सर्व निघून जातात. )

———

## प्रवेश पांचवा.

### स्थळ—भगवानदास सावकाराचें घर.

(तिथे व्यापाऱ्याचा वेष घेतलेले रामोशी व भगवानदास बोलत बसले आहेत तों पडदा उघडतो.)

**भगवानदास**-( रामोशांस ) त्याच्या सांगण्यांत व तुमच्या बोलण्यांत विचार पाहतां मोठेंच अंतर दिसतें. तो तर साफ सांगतो कीं, कांहीं झालें तरी माझा सासरा माझ्या बायकोला बरोबर घेऊन माझा शोध करीत कधीं ही येणार नाहीं.

**मन्याबा**—त्याचें सांगणें बरोबर आहे· शेट-साहेब ! जो मुद्दाम आपल्या बायकोचा सहवास नको ह्मणून स्व-देश सोडून आला, तो वेळेस सासऱ्याला व बायकोलाही नाकबूल करील. तरी हें जोडण्याचें सूत्र सुयंत्र जमवून देऊन सुयश व पुण्य मिळविणें आपल्या हातीं आहे. आपण जर हुकूम करीत असाल तर मुलीलाही या ठि-काणीं घेऊन येतों. तिच्याकडे पहाल तर केवळ गाय आहे. आपणास तिची ममता आल्यावांचून राहणार नाहीं. याबद्दल आमची पूर्ण खात्री आहे.

**भगवानदास**—हें काम जर तुह्मी माझ्या अंगावर टाकीत असलां, तर मी सांगेन त्या प्रमाणें तुह्मांला वा-गलें पाहिजे.

**रामोशी**—कबूल ! कबूल ! ! आपण आज्ञा करावी आणि आह्मीं त्या आज्ञेप्रमाणें वागतों कीं नाहीं हें पहावें पाहिजे तर.

भगवानदास—वागाल. त्यांत पहावयाचें काय आहे ? तरी असें करा, तुमचें बिऱ्हाड जें धर्मशाळेंत आहे, तें चार दिवस तेथेंच असूं द्या. तुमच्या मुलीला मात्र आणून आमच्या घरीं ठेवा. ह्मणजे सहज बोलतां चालतां आह्मीं तिचें व तिच्या नवऱ्याचें सूत्र जमवून देऊं. तुह्मांस तुमच्या जांवयाचें व मुलीस नवऱ्याचें अगत्य आहे तर तुह्मांला असें केलेंच पाहिजे.

रामोशी—आह्मीं कोठें नाहीं ह्मणतों ? आपण सांगाल तें आह्मांला मान्य आहे. ( हऱ्यास ) हरिदास, जा धर्मशाळेंत आणि आपल्या बहिणीला इकडे घेऊन ये. ती या घरांत येऊन राहिली ह्मणजे आमचें अर्ध्याहून अधिक काम झालें असें आह्मीं समजतों. त्यांतून आपणासारख्या थोर लोकांनीं मनावर घरलें ह्मणजे होणार नाहीं असें कांहींच नाहीं. [ हऱ्याकडे वळून ] कायरे ? तूं अजून बसलेलाच !

हऱ्या—मला हो काय ? हा चाललों पहा. [ जातो. ]

भगवानदास—[ रामोशांस ] तुमचा जांवई जेव्हां प्रवास करण्याचे उद्देशानें आपल्या घरांतून बाहेर पडला तेव्हां तुमची मुलगी कोणत्या ठिकाणीं होती ?

मन्याबा—ते जेव्हां प्रवासास निघाले, तेव्हां ती आ-




मच्या घरीं होती. कारण व्यापारसंबंधानें व्याह्यांचा व आमचा बेबनाव झाल्यादिवसापासून त्यांनीं आपल्या सुनेला नेण्याची गोष्टच सोडून दिली असें आमच्या अनुभवास आलें. त्यावेळीं आमच्या मुलीचेंही वय लहान होतें. ह्मणून आह्मी तिकडे विशेष लक्ष्य दिलें नाहीं. पण आतां ती उपवर झाली तेव्हां आपल्या नवऱ्याजवळ जाऊन राहिलीच पाहिजे. हें जाणून आह्मी जांवयाचा शोध केला; तों ते प्रवासांत गेल्याचें कळलें. नंतरही कांहीं दिवस वाट पाहिली आणि शोधासाठीं मुलीलाही बरोबर घेऊन निघालों. बायको आहे ती नवऱ्याच्या हवालीं करावी आणि आपण आपल्या घरीं निघून जावें हा उद्देश. यांत कांहीं गैर असेल तर आपण सांगावें.

भगवानदास—तुमचा उद्देश कांहीं वावगा नाहीं.

( इतक्यांत हऱ्या व रंगी हीं दोघें येतात. )

रंगी—( तर्कानें भगवानदासास ओळखून मर्यादेनें त्याच्यापुढें जातें व नमस्कार करून सलज्ज एके बाजूस उभी राहते. )

भगवानदास—( आपल्याशीं ) मुलगी तर मर्यादशील आणि सुस्वरूप आहे. ही आमच्या बाळासाहेबास बायको शोभण्यासारखी आहे. (उघड) कोण आहेरे तेथें?

**एक चाकर**–[ प्रवेश करून ] मी घर्म्या हैं शेट-साहेब !

**भगवानदास**–अरे, घरांत जा आणि मी बोलावतों आहें ह्मणून सांग बरें. लौकर बाहेर या ह्मणावें.

**चाकर**–( जी. जातो. )

**मन्यावा**–शेटसाहेब, पोरगी फार चांगली आहे हो ! केवळ आह्मां व्याह्यांत बेबनाव झाल्यामुळें, किंवा केवळ आमच्या चुकीनें आजपर्यंत पतिसुखास अंतरली आहे.

**भगवानदास**–परमेश्वर करील तर आतां सर्व सुखच होईल.

**चाकर**–( सावकारस्त्रीसह प्रवेश करून मालकिणीस ) ह्या बसल्याती धनी साब.

**सावकार स्त्री**–( भगवानदासाजवळ जाऊन ) मला कां बोलाविलं बाहेर? असं माझ्याशिवाय काय नडलं आहे?

**रंगी**–( लाजत पुढें येऊन सावकार स्त्रीस नमस्कार करून उभी राहते. )

**सावकार स्त्री**–अगबाई ! ही कोण ? जन्मसावित्री हो बाई !

**भगवानदास**–ही आपल्या बाळासाहेबाची बायको !

**सावकार स्त्री**–पण तो ह्मणतो कीं माझी बायको व

व सासरा कधीं कांहीं झालें तरी इकडे येणार नाहींत.

**भगवानदास**--तो सगळा निराळाच प्रकार आहे. मी तुला मग तो सर्व सांगेन. आतां तूं या मुलीला घेऊन घरांत जा आणि रात्रौ बाळासाहेबाची व हिची भेट होईल असें कर. मग ती आहे व तो आहे. दोघें आपसांत समजुत करून घेतील. ( मन्याबास ) कां? असेंच कीं नाहीं?

**मन्याबा**--सोन्याहून पिवळें. [ रंगीस ] बाई, सुखा समाधानानें आपल्या पतिबरोबर नांद आणि आपल्या कुळाचें नांव राख.

**सावकाराचीस्त्री**--चल बाई घरांत. ( रंगीसह जाते.)

**भगवानदास**--आतां तुह्मीं आपल्या ठिकाणीं जा. तो घरीं येण्याची वेळ झाली आहे. तुमचें व त्याच्या बापाचें वैमनस्य त्याला ठाऊक असेल तर तुमचें आजच येथें असणें कांहीं चांगलें नाहीं. आजच्या रात्रीचा रंग कसा काय होतो तो पाहूं आणि उद्यां त्याची व तुमची भेट होईल असें करूं.

**मन्याबा**--आमची व त्यांची भेट न झाली तरी आ-ह्मांला पतकरलें! त्यांनीं आपल्या बायकोचा अंगिकार केला ह्मणजे आह्मीं कृतकार्य झालों, असें मी समजतों.

( हन्या व जन्या यांजकडे पाहून ) चला आतां आपल्या बिऱ्हाडावर.

**जन्या**—चला शेट साहेब, बहुतकरून काम पार पडलें.

**मन्याबा**—ईश्वर करील तर आणि हे शेटसाहेब पूर्ण ममता ठेवितील तर. ( भगवान्‌दासास नमून ) येतों तर आतां.

**भगवानदास**—यावें. तसाच प्रसंग आला तर आपणांस मी बोलावणें पाठवीन.

**मन्याबा**—ठीक आहे. ( दोघां मुलांसह निघून जातो )

**भागवानदास**—मुलगी सुलक्षणी व तिचा बाप दिसण्यांत सभ्य आहे. असें असतां व्याह्यांबरोबर भांडला याचें आश्चर्य वाटतें. दुसरा प्रकार असा कीं, बोलतांना साखर पसरणारा आहे.

**पद्माकर**—( प्रवेश करून व भगवानदासास नमून ) त्या मारवाड्याची अगदीं खोड मोडली ! व्यापाराच्या कामांत पुनः कांहीं तो आपल्याशीं होड लावणार नाहीं.

**भगवानदास**—शाबास ! तो अगदीं जेर झालानां? हें तूं स्वतः काम पाहूं लागलास ह्मणून झालें. असो. बाळासाहेब, तुझा सासरा तुझ्या बायकोला घेऊन आला आहे इतकेंच काल तुला सांगितलें होतें. पण आज तुझी बा-

यको आपल्या घरीं आली आहे. मुलगी चांगली मर्यादशील व रूपगुणसंपन्न आहे. तिच्या बापाचें व तुझ्या बापाचें वांकडें पडलें असलें तरी तूं आपल्या बायकोला सोडून द्यावेंस हें न्यायाचें होत नाहीं.

पद्माकर—बाबासाहेब, आतां मी बोलतों याबद्दल आपण मला क्षमा करावी. आपण जें हें काय बोलतां, याचा कांहीं मला समज पडत नाहीं. माझ्या सासऱ्याचें व माझ्या बापाचें वांकडें पडल्याचें मला तर कांहीं स्मरत नाहीं. बरें, मी आपल्या बायकोलाही सोडून दिलें नाहीं.

भगवानदास—तर काय तो गृहस्थ सगळेंच खोटें सांगतों ?

पद्माकर—कोणता तो गृहस्थ?

भगवानदास—अरे तो तुझा सासरा! तुझ्या बायकोचा बाप? त्याच्या बरोबर तुझे दोन मेव्हणेही आले आहेत.

पद्माकर—मला तर हें सगळें थोतांड दिसतें.

भगवानदास—तुझी व तुझ्या सासऱ्याची ओळख आहे कीं, नाहीं?

पद्माकर—माझ्या सासऱ्याची व माझी ओळख आहे.

भगवानदास—त्याचें आणि तुझ्या बापाचें किंवा तुझें कांहीं वांकडें पडलेलें नाहीं नां?

पद्माकर—नाहीं.

भगवानदास—असें आहे तर याच वेळेस मी त्याला बोलावणें पाठवितों. तोंपर्यंत तूं घरांत जा आणि आपल्या बायकोलाही पाहून ये पाहिजे तर.

पद्माकर—ठीक आहे. आपण बोलावणें पाठवावें. मी घरांत जातों, आणि कोण बायको आली आहे ती पाहून येतों. जो ऐकावा तो चमत्कारच. [ जातो. ]

भगवानदास—[ मागें पाहून ] धर्म्या, अरे धर्म्या!

चाकर—( प्रवेश करून ) जी जी! काय हुकूम है?

भगवानदास—अरे, आपल्या त्या विष्णुमंदीरच्या धर्मशाळेंत आपल्या बाळासाहेबाचा सासरा उतरला आहे, त्याला बोलावून आण बरें. या ह्मणावें. तुमचे जांवई तुमची भेट व्हावी असें इच्छिताहेत.

धर्म्या—जी हुकूम. [ निघून जातो. ]

भगवानदास—ते येत तोंपर्यंत काल बाळासाहेबानें नवे घोडे आणले आहेत ते कसे काय आहेत तें आपण ही पाहून यावें. [ असें बोलून निघून जातो. ]

———

# प्रवेश सहावा.

**स्थळ—भगवानदासाच्या घरांतील महाल.**

( रंगी व भगवानदासाची स्त्री बोलत बसलीं आहेत तों पद्माकर त्यांच्या समोर येऊन उभा राहतो. )

**सावकारस्त्री**–( पद्माकरास पाहून रंगीस ) हा पहा तुझा नवरा आला. ( पद्माकरास ) बाळा, आज लौकर घरांत आलास हें फार चांगलें झालें! हें कोण आलें आहे पाहिलेंसनां?

**पद्माकर**–( रंगीकडे लक्ष्यपूर्वक पाहून आपल्याशीं ) ही काय माझी बायको! असें होईल कसें? इतक्यांत तिचें स्वरूप इतकें पालटून जाईल? मला इकडे येऊन पुरतें एक वर्षही लोटलें नाहीं.

**सावकारस्त्री**–बाळा, असा विचारांत काय पडलास? माझ्या देखत तिच्या जवळ बोलायचा जर तुला संकोच वाटत असेल तर मी तिकडे बायका वाती करिताहेत तिकडे निघून जातें. ( असें बोलून निघून जाते. )

**पद्माकर**–वाहवा! हा चांगला विचार! आतां ही माझी स्त्री नव्हे, याबद्दल मी यांची खात्री कशी करावी? आणि भलत्याच कधीं न पाहिलेल्या स्त्रीचा अं-

गिकार तरी कसा करावा? हें कांहींच मला समजत नाहीं.

रंगी—आतां समजत नाहीं असं होणारच. पहिल्यानं एखाद्या भोळ्या स्वभावाच्या माणसाचं चित्त हरण करावं आणि मग त्याची आठवण ही ठेऊं नये; हें कुलीन व समंजस ह्मणविणारांलाच शोभतं. महाराज, या दासीनं आपला हा देह, यांत वास करणारं मन आणि चित्त आपल्या चरणांवर वाहिलं आहे. तर या दासीचा अंगिकार करून हिला कृतार्थ करावं, इतकीच अनन्यभावें करून माझी प्रार्थना आहे.

पद्माकर—अगे, पण तुझ्या बापाचें व माझ्या बापाचें वांकडें पडलें आणि तूं माझी लग्नाची स्त्री असून तुझा मी त्याग केला आहे. इत्यादिक विलक्षण प्रकार जो तुझ्या बापानें आमच्या मालकाजवळ सांगितला, त्याचा भावार्थ काय? तुझें व माझें लग्न कधीं झालें आहे? हें ईश्वराला स्मरून तूंच सत्य सांग बरें?

रंगी—आपलं व माझं लग्न झालेलं आहे असं कांहीं मी ह्मणत नाहीं. माझा बाप ह्मणून जो या ठिकाणीं मला घेऊन आला आहे, त्याचं व आपल्या बापाचं वांकडं आहे, तें कसं पडलं? हें जर आपण त्याला पहाल तर कदाचित् ओळखाल. नाहींतर प्रसंगोपात तें मीच

आपणाजवळ सांगेन. आतां मी आपणास पति ह्मणतें याचं कारण—आपण आपल्या विजयनगरांत असतांना आपणास मी अनेक प्रसंगीं पाहिलेलं आहे आणि विवाह करावयाचा तर तो आपणाजवळच करावा व आपली दासी ह्मणूनच रहावं, असा आज कित्येक दिवस पर्यंत मी निश्चय करून ठेवलेला आहे. पण तो प्रगट करण्याचा प्रसंग अशा प्रकारानं आला आहे.

पद्माकर—असो. तूं काय ह्मणतेस तें मला कांहीं कळत नाहीं. माझा सासरा होऊन आलेला तो कोण आहे? एक वेळ पहावा तरी, ह्मणून आमच्या मालकांकडूनच त्याला बोलावणें पाठविलें आहे. त्याला आधीं पाहून येतों; मग तूं काय ह्मणतेस त्याचा विचार करितां येईल.

रंगी—महाराज, आपण त्याला पहाल आणि आपल्या चातुर्यानें कदाचित त्याला ओळखालही. तरी मी सांगून ठेवतें कीं, जरी मी त्याच्या सांगण्यावरूच या ठिकाणीं आपली विवाहित स्त्री बनून आलें आहें, तरी त्याच्या व माझ्या मनोविचारांत फारच अंतर आहे. त्यानं मला कांहीं जरी सांगितलेलं असलं, तरी तें मी त्याच्या तोंडापुरतं मात्र कबूल केलं आहे. ह्मणून त्याला

पाहिल्यावर मजविषयीं आपल्या मनांत संशय उत्पन्न होईल, तर तसं न व्हावं. मी आपली आज्ञाधारक दासी होऊन राहण्याचा निश्चय मला उत्पन्नकर्त्या ईश्वराच्या साक्षीनं केला आहे, तो कधीं मिथ्या होणार नाहीं. आपण मात्र मजविषयीं मन शुद्ध ठेवावं.

पद्माकर—ठीक आहे. जातों तर, आधीं तो कोण आहे हें पाहतों; नंतर तुझ्या बोलण्याचा विचार करीन.

रंगी—तुजविषयीं मनांत किंतु आणणार नाहीं, असं ह्मणून मला वचन द्यावं आणि जाऊन तो कोण आहे तें पाहून यावं. त्याबद्दल मी नको ह्मणत नाहीं.

पद्माकर—विनाकारण कांहीं तुजविषयीं मनांत किंतु बाळगणार नाहीं. पण जर कारणच उपस्थित होईल तर किंतु आल्यावांचून राहणार नाहीं, हें मी सांगून ठेवतों. मग तो तुला आपल्या निश्चयाच्या बळानें नाहींसा करावा लागेल.

रंगी—असो, दैव माझं. कसाही प्रकार असला तरी मी आपणास काया, वाचा, मनेंकरून वरलं आहे. आपणाशिवाय या जगांत इतर जे पुरुष आहेत, ते माझ्या बापा भावाप्रमाणं आहेत, ही शपथ मी आपल्या खरो-

खरीच्या कुलशीलास आठवून व आपल्या चरणांवर लक्ष ठेऊन घेतली आहे.

चाकर—( प्रवेश करून ) बाळासाब, आपल सासर आल्याती अन् बाबासाब तुमास्नी बोलावल्याती.

पद्माकर—ठीक आहे. मी हा आलोंच, तूं चल पुढें.

चाकर—जी. बेगि बेगि या मजी झाल. ( जातो. )

पद्माकर—( रंगीस ) बसा तुह्मी. कोण आले आहेत तें पाहून येतों. ओळख पटली तर ठीकच आहे.

रंगी—हजार हिश्शांनीं ओळख पटणार आणि त्यापासून माझ्या निश्चयाच्या संबंधानं आपल्या मनांत संशय उत्पन्न होणार आहे तो न व्हावा, इतकीच प्रार्थना आहे.

पद्माकर—असो. तो विचार पुढचा आहे. मग पाहतां येईल. ( जातो. )

रंगी—देवा, असल्या राजबिंड्या तरुणाजवळ कपटानं वागावं आणि मेल्या रामोशांच्या नादानं त्याचा प्राण घेण्यास कारण होऊन जिवाला शाश्वत हुरहुर लाऊन घ्यावी; त्यापेक्षां हा सावकार पुत्र पद्माकर जात्याच चतुर व शूर आहे, यालाच मनोभावानं वरून आपल्या जन्माचं सार्थक होईल; आणि ज्या मेल्या रामो-

शांनीं माझ्या अज्ञानदशेंत माझ्या आईबापाला मारून त्यांच्या जिनगानीसह मला चोरून नेऊन मला एकटीला मात्र आपणांत वाढविलं त्यांचा सूड घ्यावा; ह्मणजे आइबापाच्या पोटीं जन्म घेतल्याचं खरं श्रय येईल. ( कांहीं थांबून ) हो, झाला हाच निश्चय. आतां ते रामोशी आहेत असं जरी त्यांनीं ओळखलं, तरी त्यांच्या मनांत आपला निर्मळपणा आणि खरा भाव भरून दिलाच पाहिजे. तें काम किती कष्टप्रद होईल हें मात्र याचवेळीं सांगतां येत नाहीं.

एक कुळंबीण–[ प्रवेश करून रंगीस ] धाकल्या बाईसाव, तुमास्नी आईसाव बोलावत्याती. चला बेगी.

रंगी–मला आंत कां बोलावताहेत ? चल बाई.

( दोघी जातात. )

---

## प्रवेश सातवा.

### स्थळ—भगवानदासाच्या वाड्यांतील बैठकीची जागा.

[ रामोशी, व्यापारी व भगवानदास बोलत बसले आहेत तों पद्माकर येऊन रामोशांस पाहतांच ओळखून चपापतो आणि आपल्याशींच विचार करीत उभा राहतो. ]

पद्माकर-[ आपल्याशीं ] हे तर रामोशी आहेत. ज्यानीं आमच्या घरावर दरोडा घातला, ह्मणून बाबांनीं ज्यांचीं नांवें लिहिलीं होतीं, त्यांपैकीं हा ह्मातारा मन्याबा रामोशी! हा आमच्या विजयनगरचा वतनदार. माझा पाठलाग करण्याकरितांही हा आला होता. पण त्यावेळीं इतरांप्रमाणें माझ्या तडाक्यांत न सांपडतां आपल्या दोन पोरांसह निसटून गेला, तो या सावकारी वेषानें माझा सासरा बनून मला फसविण्यासाठीं आपल्या पोरीला बरोबर घेऊन आला आहे. ठीक. याचें व माझ्या बापाचें खरोखरीच हाडवैर आहे, आणि माझा तरी हा वैरीच. घरांत त्या तरुणीनें तरी जी साखर पसरली होती, ती कां? हें आतां माझ्या ध्यानांत आलें. आतां या बाबासाहेबांच्या जवळ हे लोक असे असे दगलबाज आहेत असें कसें सांगावें?

भगवानदास-[ पद्माकरास पाहून ] बाळासाहेब, माझ्या सासऱ्याचें व माझ्या बापाचें किंवा माझें वांकडें नाहीं, असें सांगत होतास. तर हे तुझे सासरे बसले आहेत, यांना ओळखतोसनां तूं?

पद्माकर-ओळखतों तर खरेच. पण माझे सासरे किंवा माझ्या बायकोचे बाप ह्मणून ओळखत नाहीं.

खरोखरीच जर विचाराल, तर हे तिघेही आमच्या गांवांतील अट्टल दरोडेखोर रामोशी आहेत. हे माझा घात करण्यासाठीं मुद्दाम शोध करीत आलेले आहेत. हें ईश्वरसाक्ष मी आपणांस सांगतों. मी प्रवासासाठीं मार्गस्थ झाल्यावरही हा मन्याबा ह्मातारा रामोशी माझा पाठलाग करीत आला होता; पण त्यावेळेस सपाळ्यांत सांपडला नाहीं. बचावून गेला. तो आतां अशा वेषानें आला आहे. मला जांवई ह्मणतात तें सारें ढोंग आहे.

मन्याबा— ( भगवानदासास ) बघितलं शेटसाहेब. यांचें व आमचें वांकडें नसतें तर हे असें बोलले असते ? ( पद्माकरास ) जांवईबावा, आह्मांला जरी आतां चार शिव्या दिल्यात तरी पतकरल्या. आपल्या बायकोला नांदवा आणि तिच्यासह आनंद करीत रहा ह्मणजे झालें. आह्मीं आपली मुलगीच दिली, त्यामुळें तुमच्या गावांतील रामोशी व दरोडे घालणारे बनलों. काय ह्मणाल तें अपूर्वाईचेंच असें आह्मीं समजतों. ( भगवानदासास ) शेटजी, आह्मीं फार वेळ येथें राहिलों, तर कदाचित यांचें मस्तक अधिकही फिरेल; यासाठीं आतां आह्मीं आपला निरोप घेतों. मुलगी तुमच्या पदरांत घातली आहे, तर तिचें बरें वाईट करणें सर्व आपल्या हातीं आहे. आतां

पहांटेस चंद्रोदय झाला, ह्मणजे गाड्याजुंपून आह्मीं मार्गस्थ होऊं. आपली व आमची हीच शेवटची भेट.

**भगवानदास**—ठीक आहे, यावें. मुलीविषयीं अगदीं काळजी करूं नका. बाळासाहेब या वेळीं जरी रागवला आहे तरी आमच्या आज्ञेच्या बाहेर वागेल असें कांहीं मला वाटत नाहीं.

**मन्याबा**—आपल्या आज्ञे बाहेर नच वागोत व आपल्या बायकोसह सुखासमाधानानें वागोत. तेवढ्यानेंच आह्मीं तृप्त आहों. ( पद्माकरास ) जांवईबुवा, तुह्मी द्या शिव्या. आह्मांला लाजच नाहीं ह्मणून येतों. मेहेरबानी ठेवा, असें सांगून जातों.

**पद्माकर**—जारे ठगा! किती वात्रटपणा करशील? मी जर तुला ओळखलें नसतें, तर तुझें हें बोलणें शोभलें असतें. आतां तुला शेवटचें सांगतों—तूं याहून दुसरीं पाहिजे त्या तऱ्हेचीं सोंगें घेऊन मला फसविण्याकरितां ये, हा पद्माकर कांहीं तुला फसणार नाहीं. त्याचप्रमाणें तसा प्रसंग आला ह्मणजे तुझ्या साथीदारांची काय वाट लावली, ती तूं पाहिलीच आहेस. त्याच वाटेनें तुझ्या दोन्हीं मुलांसह तुला पाठवीन आणि निर्भय होऊन जगांत आनंद करीत राहीन.

ह्न्या—( मन्याबास ) चला हो बाबा, काय ऐकतां त्यांचें. त्यांचं मस्तक जों जों फिरेल तों तों ते अधिक बोलतील.

**मन्याबा**—खरेंच तें. (भगवानदासास) वेतों तर आज्ञा.

**भगवानदास**—यावें.

**मन्याबा**—[ आपल्या दोन मुलांसह जातां जातां ] एकवेळ शेवटचें पोरीला भेटलों असतों तर बरें झालं असतें.

**भगवानदास**—तुमच्या मनांतून मुलीला भेटावें असें आहे तर क्षणभर थांबा. किंवा तुह्मींच आंत जाऊन भेटा. ( मागें पाहून ) धर्म्या, अरे धर्म्या ! जरा बाहेर ये बरें.

**चाकर**—( प्रवेश करून ) जी, ! काय हुकूम है ?

**भगवानदास**—अरे, आंत बाळासाहेबाची बायका आलेली तुला ठाऊक आहेनां ? तिच्या बापाला आपल्या बरोबर तिच्याकडे घेऊन जा बरं.

**चाकर**—लई व्येस है. [ रामोशांस ] पाव्हनं, चला माज्या संग आतमंदी. मजी मिळत्याल नव्या बाईसाब.

**मन्याबा**—ठीक आहे. चल बाबा. [ चाकरासह रामोशी जातात. ]

**भगवानदास**—बाळासाहेब, त्या सासऱ्याला पाहतांच तुझें मस्तक फिरलें याचा अर्थ काय? त्याला अगदीं रामोशीच ठरविलास!

**पद्माकर**—खरोखरच तो रामोशी आहे. सावकाराचें सोंग घेऊन मला आपल्या मुलीच्या नादांत गुंतवावें आणि शेवटीं फसवावें हाच त्याचा उद्देश आहे. मी सांगतों हें आपणांस खरें वाटत नाहीं त्याला माझा नाइलाज आहे. त्याची मुलगी जी आपण माझी बायको समजून मुद्दाम घरांत ठेवली आहे तिलाही मी पाहिलें. खरोखर तिचा व माझा कांहीं विवाह झालेला नाहीं. तिच्या सुबकपणाकडे पाहून आपणांस मात्र भ्रम पडला आहे, तो केव्हां नाहींसा होईल हें कळत नाहीं.

**भगवानदास**—भ्रम कशाचा पडतो आह्मांला! तुझ्या सारखे एककल्ली तरुण अशाच बायका सोडून देतात, हें मात्र चांगल्या तऱ्हेनें मला ठाऊक आहे. (दाढीस हात लाऊन) अरे बेट्या, माझे हे काळे होते ते पांढरे झाले, अजून तूं मला शिकविणारच काय?

**पद्माकर**—पांढरे झाले हें मी कबूल करतों. तरी हा रामोशी माझा सासरा बनून आपणांस ठकवीत आहे, असें जें मी सांगतों, तें कधीं खोटें होणार नाहीं. पुढेंमागें

केव्हां तरी आपणांस माझ्या बोलण्याचा अनुभव येईल.

भगवानदास—तूं असें सांगतोस तर तो आपल्या मुलीजवळ काय बोलतो तें हळूच जाऊन ऐकूं चल.

पद्माकर—ठीक आहे चलावें. [दोघे निघून जातात.]

---

## प्रवेश आठवा.

स्थळ—भगवानदासाच्या घरांतील एकांत स्थान.

[व्यापाऱ्याच्या वेषानें मन्याबा आदिकरून रामोशी व रंगी बोलत बसली आहे तों पडदा उघडतो.]

मन्याबा—ध्यानांत राहीलनां बाई? तो तुझ्या चांगल्या आटोक्यांत आला व तुजपाशीं दिलेल्या वस्तूचा अंमल त्याच्यावर चांगला बसला ह्मणजे आपल्या खिडकीच्या बाहेर सांगितलेली खूण लाऊन ठेव. दर चार चार घटिकांनीं आह्मीं खूण लागलेली आहे कीं काय हें पाहतोंच आहों असें समज.

रंगी—ठीक आहे. त्या विषयीं तूं काळजी करूं नको. तुझ्या इच्छेप्रमाणें सगळी व्यवस्था करून खूण लावीन, त्यावेळीं ये मात्र, ह्मणजे झालं. नाहींतर मी खूण लावावी आणि तुह्मीं कोणी येऊं नये.

हन्या—असं कसं व्हईल रंगे? त्यानं आमची सगळी ज्यात मारलीया. त्याचा सूड तर घेतलाच पाहिजे.

मन्यावा—ते राहूंदेरे. ( रंगीस ) तुला सांगितलं आहे तें ध्यानांत ठेव. आह्मी आतां जातों. नीट जपून वाग ह्मणजे झालं.

रंगी—त्याबद्दल तुह्मी अगदीं काळजी करूं नका.

जन्या—चला तर आतां. जातो तर ताई!

रंगी—जा. [ रामोशी जातात व भगवानदास व पद्माकर हे दोघे येतात. ]

भगवानदास—काय त्याचा शब्द गैर ऐकलास! बिचारा सालस तो. कांहीं कारणावरून तुझ्या व त्या घराण्याचें वांकडें आलें हें मात्र खरें. तरी त्या पोरीनें कांहीं अपराध केला असेल, असें कांहीं माझी मनोदेवता सांगत नाहीं. आतां ते कसेंही असो. तो बिचारा निघून गेलाच आहे. तेव्हां त्याला बेरड, रामोशी ह्मणण्यांत अर्थ नाहीं. त्याची मुलगी येथें राहिली आहे व ती तर निरपराध आहे.

पद्माकर—बापाप्रमाणें ती माझ्या पाठलागांत आली नव्हती हें खरें आहे. तरी बीज तसा अंकूर. प्रसंगीं काय करील कोण जाणे. बापानें कांहीं सांगून ठेवलें असलें

आणि आज्ञाधारकपणानें त्याप्रमाणें वागण्याचें तिच्या मनांत आलें नाहीं तोंपर्यंत साऱ्या गोष्टी.

भगवानदास—तुझें हें बोलणें मला खरें वाटत नाहीं आणि पसंत पडत नाहीं. ती बिचारी तुझी बायको, आपण दोघे या ठिकाणीं आल्यामुळें संकोचून उभी राहिली आहे. तर विनाकारण तिला दुःख देणें हा आपला धर्म नाहीं. यासाठीं आपण आपल्या कचेरीच्या जागीं जाऊं चल.

पद्माकर—ठीक आहे. चलावें. आतां माझी शेवटची प्रार्थना आपल्या चरणांजवळ हीच आहे कीं, आपल्या मनानें ती रामोशाची मुलगी माझी बायकोच असें मानून जर तिचें पालन करणें आहे तर तिला आपल्या घरांत न ठेवितां बाहेर कोठें तरी निराळी जागा घेऊन देऊन मनास वाटेल तसें तिचें पालन करावें. त्यांत माझें कांहीं जात नाहीं. ती जर घरांतच रहात आहे तर केव्हां दरोडा येईल याचा नेम नाहीं. तसें न करतां मनास वाटेल त्याप्रमाणें वागाल आणि पुढेंमागें माझ्यावर दोष द्याल, ठाऊक असून सांगितलें नाहींस ह्मणाल ह्मणून सांगतों.

भगवानदास—ठीक आहे. तुझी तशी इच्छा आहे

तर तिला निराळ्या घरांत निराळी व्यवस्था करवून ठे-
वतों. तूं नित्य तिकडे जाऊन रात्रभर असत जा. ह्मणजे
आमचें बोलणें नाहीं.

पद्माकर—आपणास जर माझ्या जीवितांचा कं-
टाळा आला असला, तर आपण अशी आज्ञा करावी.
कारण—माझा प्राण घेण्यासाठींच त्या रामोशांनीं तिला
शिकवून येथें ठेविलें आहे, हें माझ्या चित्ताला सबळ
प्रमाणानें माहित आहे. अहो ती मायावी तरुणी, येथें
आली नाहीं तों तिनें तुमच्या व घरांत आईच्याही म-
नांत स्वतः विषयीं मोह उत्पन्न केला; तो इतका कीं, प्र-
त्यक्ष मी सांगतों तरी तुमच्या मनांची खात्री होत नाहीं.
तिच्या ताब्यांत मी रात्रभर सांपडलों कीं मेलोंच असें
खात्रीनें समजा.

भगवानदास—मी तिच्या बापाला वचन दिलें
आहे ह्मणून माझ्या विश्वासावर तो तिला एकटीला येथें
ठेऊन गेला आहे. तर जरी तूं तिचा अंगिकार न के-
लास; तरी मुलीप्रमाणें मला तिचें पालन करणें भाग
आहे. आतां तूं " ती खरोखर रामोशाची आहे, तिला
घरांतही वस्तीला ठेऊं नका. " असें सांगतोस, तर
आपल्या शेजारच्या बागेंतला रंगमहाल रिकामा आहे.

त्यांत तिला ठेवतों. चार कामकरणी ठेवल्या ह्मणजे लागली तिची व्यवस्था. त्या महालाचा व आपल्या घराचा संबंध नाहीं हें तूं जाणतोसना?

पद्माकर—तें सर्व मी जाणतों. तिची रात्रीची वस्ती आपल्या घराच्या बाहेर झाली पाहिजे. नाहींतर घरावर घाड आलीच समजा. ते खरोखर दरोडेखोर रामोशी आहेत आणि त्यांची मुलगी घरांत! मग रात्रीं तिनें त्यांनां दार कां उघडूं नये सांगा बरें?

भगवानदास—तें कांहीं असो. त्यांच्या संबंधानें तुझें मस्तक चांगलेंच फिरलें आहे, असें मात्र यावरून चांगलें सिद्ध होतें. आतां रीतीनें पाहिलें, तर त्यांच्याहून तूं आह्मांला अधिक प्रिय आहेस. ह्मणून तुला जर तिचें घरांत राहणें योग्य दिसत नाहीं, तर तिला एकटीलाच ठेवतों. आजच्या रात्रीं चंद्रोदय झाला ह्मणजे तिचा बाप आपल्या गांवीं निघून जाणार आहे. तो गेला ह्मणजे तर त्याबद्दल तुला धास्ती नाहीं?

पद्माकर—तो पोरीला ठेऊन निघून जाईल असा आपला समज आहे? अगदीं खोटा! दुसरा एखादा वेष घेईल आणि शेवटपर्यंत तो येथेंच राहील.

भगवानदास—त्याच्या चांगुलपणाच्या संबंधानें

तूं अगदीं बोलणार नाहींस हें मला समजून चुकलें आहे. आतां तूं दुकानावर जा आणि मी तुझ्या बायकोची बागेतील रंगमहालांत राहण्याची व्यवस्था करतों. तुझ्या मनाप्रमाणें मला केलेंच पाहिजे.

**पद्माकर**—माझ्यावर इतकें ममत्व असलें म्हणजे मी सुखी आहे. हा चाललो पहा दुकानावर [ जातो. ]

**भगवानदास**—नित्य लाखो रुपयांचा लाभ ज्याच्यापासून होतो, त्यावर ममता न करावी तर दुसऱ्या कोणावर करावी? त्यांत दुसरा प्रकार असा कीं, प्रत्यक्ष पोटचा पुत्र इतका आज्ञाधारक निपजणार नाहीं, त्यामुळें घरादाराचें प्रेम स्वाभाविक रीतीनेंही त्यानें ओढून घेतलें आहे. अत्यंत चतुर, शाहणा, लीन, अशी सर्वोत्तम प्रकृति असतां हा, सासरा होऊन येणाऱ्या ह्माताऱ्यावरच इतका चिडतो आणि त्याच्या तोंडावर भीड न धरितां त्याला रामोशी ह्मणतो, तर त्यांत कांहीं तरी तथ्य प्रकार असला पाहिजे. (कांहीं थांबून) चला तर. त्याच्याजवळ कबूल केल्याप्रमाणें दिवे लागणीच्या आधीं त्या महालांत तिची रवानगी केली पाहिजे. ( जातो. )

———

## प्रवेश नववा.

### स्थळ—बागेंतील रंगमहाल.

( एकटीच रंगी विचार करीत येते. )

रंगी–( मोठ्या दुःखानें कोंचावर बसून ) देवा, कशाला मला जन्मास घातलंस? आणि जन्म दिलास तर या मेल्या अबल देहाचे असे धिंडवडे कां करीत आहेस! चांगल्या सभ्य कुळांत जन्मास घातलं होतंस. पण पांच वर्षांचं वय झालं नाहीं तों आईबापानीं मला बरोबर घेऊन तीर्थयात्रेस निघावं. मार्गांत त्या उभयतांस त्यांच्या परिवारासह चोरांनीं त्यांना मारावं, आणि मजसह त्यांची सर्व संपत्ति हरण करून न्यावी, हें कसं माझ्या दैवीं लिहिलंस? त्या प्रसंगात एक बिचारी माझी दाई मात्र त्या मेल्यांनीं केवळ मला संभाळण्यासाठींच जिवंत ठेवली असेल. तिला तरी मी कोणाची कोण याबद्दल परिज्ञान होऊं नये असा हुकूम होता. त्याप्रमाणं त्या बिचारीनं उघडपणीं कधीं कांहीं सांगितलं नाहीं. तरी बारावर्षांचं माझं वय झाल्यावर जेव्हां तिचा मरणकाल जवळ आला असं तिला वाटलं, तेव्हां तिनं आसपास जवळ कोणी नाहीं, अशी खात्री करून घेऊन

मला हें सगळं सांगितलं; आणि " बाई, जरी तूं रामोशांत वाढलीस तरी आपलं कुळ विसरूं नको, आणि त्याला बट्टा येईल असं कर्म करूं नको. " असं सांगून शेवटचा श्वास सोडला. तेव्हांपासून किंवा त्याच्या आधींपासून मी रामोशाचीच मुलगी. मेल्यांनीं आपल्या दगलबाजीच्या उद्योगासाठीं मला नानाप्रकारचीं कसबं शिकविलीं. त्याप्रमाणं आजपर्यंत मी आपलं कुलशील कायम राखून त्यांच्या उपयोगीं पडलें. माझ्या जन्माचं मातेरं झालं, तरी त्याबद्दल त्यांना कशाला काळजी असे-ल ? ती काळजी त्यांच्या मनाला नाहीं, ह्मणून तर " तो सावकार पुत्र पद्माकर आपला जांवई आणि ही त्याची बायको. " असं ढोंग करून मला इथं आणून ठेवलं आहे. आतां मी आपलं तारुण्य खराब करून त्याला आपल्या नादीं लावावं, त्याच्याजवळ जें खरोखर पृथ्वी मोलाचं रत्न आहे तें काढून घेऊन यांच्या हवालीं करावं आणि त्याला अमली पदार्थ घालून मग यांच्या हवालीं करावा. ह्मणजे आपल्या डोळ्यादेखत, हे मेले माझे बाप ह्मणून साव बनलेले चोर त्याचा प्राण घेणार! हर हर हर! ( कांहीं थांबून ) नकोग बाई! असं अघोर पाप करून तें किती जन्म घेऊन फेडावं? कधींच

नाहीं आणि आतांच जर त्यांनीं आपल्या तोंडानं " ही त्याची बायको आहे. " असं सांगून राजरोसपणें मला बाबासाहेबांच्या हवालीं केलं आहे, तर शेवटपर्यंत मी त्याची खरोखर बायकोच होऊन राहीन, आणि पातिव्रत्यानं वागून आपल्या जन्माचं सार्थक करून घेईन. " ही रामोशाचीच आहे " असें मनांत धरून चार दिवस ते इकडे येत नाहींत, आणि मनमोकळें करून बोलत नाहींत तरी कांहीं चिंता नाहीं. प्रत्येकानं आपापल्या जीवरक्षणास्तव जपून वागलंच पाहिजे. तरी आतां स्वारी आली ह्मणजे हें सगळं सांगेन आणि त्यांच्या विचाराप्रमाणं वागून या मेल्या रामोशांचा त्यांच्या हातूनच शेवट लावीन. मग तर ते मजवर निर्मळ प्रीति करूं लागतील ? ( कांहीं थांबून ) देवा, स्वारीला लौकर इकडे येण्याची बुद्धि दे. रोजच्याप्रमाणं स्वारी बागेंत येऊन कारंज्याजवळ जरी बसली, तरी पुरे आहे. आज बेलाशक जवळ जाईन आणि मनांत जो संशय आला आहे, तो अगदीं नाहींसा होण्याचा प्रयत्न करीन ( या प्रमाणें आपल्याशींच बोलत आहे तों पद्माकर बागेंत येऊन विचार करीत कारंज्याच्या बाजूस बसतो. त्याजकडे पाहून ) स्वारी येऊन कारंज्याचे फवारे पहात

बसली आहे जरा स्वस्थ झाली ह्मणजे बेधकड पुढं जावं. स्वस्थ बसून बारा वर्षं राहिलें तरी कांहीं उपयोग होणार नाहीं.

पद्माकर—( पुष्कळ वेळपर्यंत कारंजाकडे पाहून ) दैवगति कशी काय आहे हें कळत नाहीं. ह्मातारा व ह्मातारी यांना मी त्या रामोशांच्या पोरीचा आपली लग्नाची बायको मानून अंगिकार करावा, असा मोठा मनोदय. ती आपल्या जातीची नाहीं, खरोखर रामोशांची आहे ह्मणून मी जीव तोडून सांगतों तरी त्यांची खात्री होत नाहीं. रात्रीं तिच्याकडे जाण्याचें मला भय वाटतें ह्मणून दिवसा जावें असा हुकूम करतात ! पण त्या घरांत शिरलों कीं यमपुरीचा मार्ग मला दिसूं लागेल, हें कोठें त्यांच्या ध्यानांत आहे ! त्या रामोशांना पाहिलें नवतें तोंपर्यंत ती बरी असावी असें मलाही वाटलें होतें. पण जर मनाची खात्री आहे, तर तिचें तें बरेपण माझ्या काय कामाचें? पहिल्या भेटीस जिनें प्रत्यक्ष मला मोहित केलें होतें, ती आमच्या ह्मातार्‍यास भुलवील यांत नवल नाहीं. "मी-काया, वाचा, मनेंकरून तुमची आहें. मजवर विश्वास ठेऊन आपण माझा अंगिकार करावा. हा देह मी आपणास वाहिला आहे." इत्यादि तिनें

स्वतःही मला सांगितलें होतें. पण तें मीं कोणत्या आधारानें खरें मानावें? जेथें माझा जन्म झाला, जेथें मी लहानाचा मोठा झालों, त्या गांवांतील दरोडेखोर रामोशाची मुलगी ठाऊक असतां जर मी तिच्या नादीं लागलों, तर माझ्यासारखा मूर्ख मीच; दुसरा कांहीं आढळणार नाहीं. असो. आपल्या नित्यनियमाप्रमाणें घटकाभर बसून चालतें व्हावें. ज्ञात्याऱ्यानें "बागेंत जाऊन आलास कां?" असें विचारलें तर नाहीं ह्मणावें लागूं नये. [ कांहीं थांबून ] नित्य जेव्हां मी येथें येऊन बसतों, तेव्हां चांगली वेणीफणी करून ती खिडकींत येऊन माझ्याकडे पहात उभी रहात असते. आज अजून खिडकींत आली नाहीं हा काय प्रकार आहे? महालांत तिचा बाप तो रामोशी आला आहे कीं काय? तसें असेल तर फार वेळ येथें गमत राहणें योग्य नाहीं. कदाचित प्राणावरही प्रसंग यावयाचा, उठाच तर आणि आपल्या मार्गानें चालूं लागा. ( उठतो. )

रंगी–( मोठ्या नखऱ्यानें पुढें येऊन त्याच्या समोर उभी राहते. ) महाराज, रोजच्याप्रमाणें आज कांहीं मी आपणास जाऊं देणार नाहीं.

पद्माकर–कां बरें? महालांत आपल्या त्या रामोशी

बापाला बोलावून आणून बसवून ठेवलें आहेस की काय? तसें असलें तरी हा पद्माकर कांहीं गपचुप मारायाला सांपडणार नाहीं, असें त्याला जाऊन सांग. तुमच्याकडे येतांना मी तरी तयारी करूनच येत असतों. ( जवळची तरवार काढून दाखवितो. ) हें पाहिलेंसनां काय आहे तें !

रंगी—हें आहे हें नीट व.मला संतोष उत्पन्न करणारंच आहे. जो रामोशी माझा बाप बनून आला आहे, त्याच्या तावडींत सांपडून आपण विनाकारण मरावं असं मलाही वाटत नाहीं. पण हें त्या ईश्वराशिवाय दुसरा कोणी जाणत नाहीं.

पद्माकर—द्रव्यासाठीं लोकांचे गळे कापण्याचा ज्यांचा उद्योग, त्यांची व ईश्वराची ओळख असेल असें कोणत्या आधारावरून मानावें.

रंगी—तसं मानायाला जरी कांहीं आधार नसला, तरी माझं बोलणं अन्यथा नाहीं. त्याबद्दल आपण आपल्या मनाची पाहिजे तशी खात्री करून घेऊन निर्भय व्हावं आणि मगच आनंदानं माझा अंगिकार करावा. अशी माझी मनःपूर्वक प्रार्थना आहे.

पद्माकर—कोणत्या तरी प्रकारानें कां होईनां ! यानें